आमदार स्थानिक विकास कार्यक्रम

सुधारीत सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना.

महाराष्ट्र शासन

नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्थाविका- ०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

तारीख: ३१ ऑगस्ट, २०१७.

वाचा:- शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक : स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का. १४८२, दि. १२ जुलै, २०१६

प्रस्तावना:-

**संदर्भाधीन शासन निर्णयानुसार आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या कार्यान्वयनासाठी सुधारित मागदर्शक तत्वे निर्गमित करण्यात आली आहेत. सदर सूचनांनुसार अनुज्ञेय नसलेल्या तसेच कमाल आर्थिक मर्यादेपेक्षा जास्त रकमेच्या कामाची / बाबींची शिफारस सन्माननीय विधानमंडळ सदस्याने/सदस्यांनी केल्यास सर्वसाधारण नियम म्हणून ही बाब नाकारणे अनिवार्य ठरते. तथापि, या शिफारशीच्या अंमलबजावणीने शासकीय मालमत्ता निर्माण होणार असल्यास त्यापासून होणारे फायदे विचारांत घेऊन, अशा कामांमधून शासकीय मालमत्ता निर्माण होण्याच्या अटीच्या अधीन राहून विशेष बाब म्हणून मंजूर करण्याचे अधिकार मा. मंत्री (नियोजन) यांना शासन निर्णयातील परिच्छेद ३.३९ नुसार देण्यात आले आहेत. तथापि अनुज्ञेय नसलेल्या काही बाबी ज्या सांस्कृतिक, साहित्यिक, क्रीडा, पर्यावरण, शैक्षणिक, आरोग्य इ. क्षेत्रांशी संबंधित आहेत आणि अशा बाबींमध्ये शासकीय मालमत्ता निर्माण होत नाही, परंतु अशा बाबी लोकोपयोगी असल्याने त्यांना मंजूरी देण्याबाबत प्रावधान ठेवणे आवश्यक असल्याने त्या संदर्भात विशिष्ट शासन मार्गदर्शक तत्वांत / निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.**

शासन निर्णय -:

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांच्या संदर्भाधीन, शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक: स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दि. १२ जुलै, २०१६ मधील पृ.क्र. १५ वरील विशेष बाबींची प्रकरणे या शीर्षाखालील तरतूद क्रमांक ३.३९ रद्द करण्यात येत असून त्याऐवजी सुधारित तरतूद क्रमांक ३.३९ पुढीलप्रमाणे अंतर्भूत करण्यात येत आहे :-

**३.३९ विशेष बाबीची प्रकरणे:-** सदर कार्यक्रमात अनुज्ञेय नसलेल्या किंवा अनुज्ञेय असून, अनुज्ञेय आर्थिक मर्यादेपेक्षा अधिक खर्चाच्या बाबींना विशेष बाब म्हणून मंजूरीचे अधिकार नियोजन विभागाचे प्रभारी मंत्री यांना खालील तरतूदींच्या अधीन असतील:-

**(अ) अशा बाबी बांधकामाशी वा मालमत्ता उभारणीशी संबंधित असल्यास:-**

या बाबी कार्यान्वित झाल्याने शासकीय मालमत्ता निर्माण होणे आवश्यक राहील. अशा बाबींचे प्रस्ताव सन्माननीय विधानमंडळ सदस्यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे सादर केल्यावर जिल्हाधिकारी यांनी अनुषंगिक बाबींची पडताळणी करुन, ही बाब कार्यान्वित झाल्याने शासकीय मालमत्ता निर्माण होत असल्याचे व सदर मालमत्ता लोकोपयोगी ठरणार असल्याचे प्रमाणित करुन, त्यात विशेष बाब म्हणून मंजुरीचा प्रस्ताव शासनाच्या नियोजन विभागामार्फत नियोजन विभागाच्या प्रभारी मंत्रीमहोदयांना मंजुरीस्तव सादर करतील.

**(ब) अशा बाबी सांस्कृतिक, साहित्यिक, शैक्षणिक, क्रीडाविषयक, पर्यावरण वा आरोग्य विषयक असल्यास:-**

I. ज्या बाबी पूर्णत: शासकीय विभागांकडून आयोजित करण्यात येत असल्यास, तसेच या बाबी पूर्णत: शासनाने आयोजिलेला कार्यक्रम/उपक्रम (सेवाभावी संस्था/संघटनांचे सहकार्य अनुज्ञेय असेल) या स्वरुपाच्या

असल्यास, तसेच या बाबींवर खर्च केल्यानंतर कोणत्याही विशिष्ट सेवाभावी संस्था/सहकारी संस्था/संघटना यांच्यासाठी कायमस्वरुपी/ तात्पुरत्या स्वरुपात स्थावर वा जंगम मत्ता निर्माण होणार नसल्यास आणि निधी शासकीय यंत्रणेसच पूर्णत: वितरीत होणार असल्यास, विशेष बाब म्हणून मंजूरी देता येईल. अशा बाबींमध्ये एका कामाकरीता/बाबीकरीता एकापेक्षा जास्त विधानमंडळ सदस्यांचे निधी एकत्रिकरण अनुज्ञेय असेल. तथापि, एका विधानमंडळ सदस्यास अशा बाबीकरीता शिफारस करण्याची कमाल आर्थिक मर्यादा ₹ ५ लक्ष एवढी असेल. अशा बाबींचे प्रस्ताव सन्माननीय विधानमंडळ सदस्यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे सादर केल्यावर जिल्हाधिकारी हे अनुषंगिक बाबींची पडताळणी करुन, ही बाब समाजहिताची व समाजाच्या विकासासाठी आवश्यक असल्याची खातरजमा करुन विशेष बाब म्हणून मंजुरीचा प्रस्ताव शासनाच्या नियोजन विभागामार्फत नियोजन विभागाच्या प्रभारी मंत्रीमहोदयांना मंजुरीस्तव सादर करतील.

II. ज्या बाबींचा समन्वय केवळ शासकीय विभागांकडून होणार असेल व कार्यक्रम/उपक्रमाचे आयोजन सेवाभावी/सहकारी संस्था/ संघटना यांनी केले असेल आणि निधी वितरण शासकीय यंत्रणा सोडून अन्य कोणत्याही संस्थेला/संघटनेला होणार असल्यास किंवा निधी वितरण व कामे शासकीय यंत्रणेकडूनच शासनाच्या ध्येय-धोरणाचा भाग म्हणून होणार असेल तथापि, अशा कामातून कोणतीही विशिष्ट सहकारी संस्था/संघटना यांच्यासाठी कायमस्वरुपी/ तात्पुरती स्थावर मत्ता निर्माण होणार असल्यास, अशा बाबींचे प्रस्ताव सन्माननीय विधानमंडळ सदस्यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे सादर करावेत. अशा बाबींमध्ये एका कामाकरीता/बाबीकरीता एकापेक्षा जास्त विधानमंडळ सदस्यांचे निधी एकत्रिकरण अनुज्ञेय असेल. तथापि, एका विधानमंडळ सदस्यास अशा बाबीकरीता शिफारस करण्याची कमाल आर्थिक मर्यादा ₹ ५ लक्ष एवढी असेल. अशा बाबींचे प्रस्ताव प्राप्त झाल्यावर जिल्हाधिकारी हे सदर संस्था/संघटनेचे नोंदणी प्रमाणपत्र, मागील तीन वर्षाचे आर्थिक लेखे व लेखापरीक्षण अहवाल तपासून व सदर संघटना ज्या बाबींशी संबंधित निधीची मागणी आहे, त्या क्षेत्रात मागील तीन वर्षापासून कार्यरत आहे याची खातरजमा करुन व तसे प्रमाणित करुन, विशेष बाब म्हणून मंजुरीचा प्रस्ताव शासनाच्या नियोजन विभागामार्फत नियोजन विभागाच्या प्रभारी मंत्रीमहोदयांना मंजुरीस्तव सादर करतील. अशा प्रकरणांत नियोजन विभाग आवश्यक तर संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे अभिप्राय घेऊन, नियोजन विभागाचे प्रभारी मंत्री यांना विशेष बाब म्हणून मंजुरीस्तव प्रकरण सादर करेल. अशा प्रकरणांत नियोजन विभागाचे प्रभारी मंत्री यांना विशेष बाब म्हणून मंजुरीचे अधिकार एका प्रकरणासाठी/बाबीसाठी ₹२०.०० लाख या कमाल आर्थिक मर्यादेपर्यंत असतील.

**(क)** वरील “ब” मधील I व II मध्ये नमूद केलेल्या बाबींसाठी विशेष बाब मंजुरीसाठी शिफारस करतांना विधानमंडळ सदस्यास एका बाबीसाठी/प्रकरणासाठी ₹ ५ लक्ष एवढया कमाल आर्थिक मर्यादेतच शिफारशी करता येतील. तसेच एका आर्थिक वर्षात वरील “ ब ” मधील I व II मध्ये नमूद केलेल्या विविध बाबींसाठी ₹२०.०० लक्ष एवढया कमाल आर्थिक मर्यादेतच शिफारशी करता येतील.

**(ड)** विशेष बाब म्हणून मंजुरीबाबतच्या शिफारसी सरळ शासनास प्राप्त झाल्यास त्या संबंधित जिल्हाधिकारी यांना पाठवून त्यांना वरील “अ”, “ब” व “क” मधील तरतुदी विचारात घेऊन, योग्य ती कार्यवाही करण्यास कळविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११७०१५२६३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Dattatraya Joshi

Digitally signed by Anil Dattatraya Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d7de9577f1b6301ba91e582c9402233953565e9fd17971ff1b7a2b8a94cf42c6, cn=Anil Dattatraya Joshi
Date: 2017.08.31 16:52:31 +05'30'

**(अ.द. जोशी)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री याचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
६. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
७. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा, विधानभवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
९. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. सर्व जिल्हाधिकारी,
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१५. संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य मुंबई,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. सर्व उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्ताची कार्यालये,
१८. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने).
२१. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१,
२३. भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०,
२४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४ (५ प्रती),
२५. महाराष्ट्र कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी),महाराष्ट्र कमिटी,जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई-१३,
२६. इंडीयन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,
२७. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-२१,
२८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,
२९. निवडनस्ती, कार्यासन १४८२, नियोजन विभाग.